महाराष्ट्र विद्युत व यांत्रिकी अभियांत्रिकी सेवा मुख्य परीक्षा-२०२२ मधील सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत)गट-ब (राजपत्रित) या पदावर प्रतिक्षायादीद्वारे शिफारसप्राप्त उमेदवारांना नामनिर्देशनाने तात्पुरती नियुक्ती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः नियुक्ती-२०२५ /प्र.क्र.०१(१)/आ(स.अ.श्रे.२)**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
३ रा मजला, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १२ जून , २०२५

**संदर्भ :** १) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.३७४(२)/वि.यां. /२०२२/१९, दि.१६.१२.२०२४
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्रमांक एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्रमांक एसआरव्ही २०१६/प्र.क्र.२८१/बारा, दि.२१.०६.२०२१
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक परिवी २७१५/प्र.क्र.३०२/कार्या-८, दि.२२.०६.२०२१

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र विद्युत व यांत्रिकी अभियांत्रिकी सेवा मुख्य परीक्षा-२०२२ मधील सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत)गट-ब (राजपत्रित) या पदांवरील नियुक्तीसाठी सरळसेवा भरतीद्वारे घेण्यात आलेल्या एकत्रित स्पर्धात्मक परिक्षेच्या निकालावर आधारित महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांच्या क्रमांक:३७४(२)/वि.यां. /२०२२ /१९, दिनांक १६.१२.२०२४ च्या पत्रान्वये “सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत व यांत्रिकी )” पदावर नियुक्तीसाठी प्रतिक्षायादीद्वारे ८ उमेदवारांची शिफारस प्राप्त झाली आहे. शिफारस प्राप्त उमेदवारांपैकी **"परिशिष्ट-अ"** मधील नियुक्तीसाठी पात्र ७ उमेदवारांना “सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत), गट-ब राजपत्रित” या पदावर दोन वर्षांच्या परिवीक्षाधीन कालावधीसाठी तात्पुरती नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत महाराष्ट्र विद्युत व यांत्रिकी अभियांत्रिकी सेवा मुख्य परीक्षा-२०२२ अन्वये सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत) गट-ब (राजपत्रित) या पदाकरिता प्रतिक्षायादीद्वारे शिफारस केलेल्या **"परिशिष्ट-अ"** मधील नियुक्तीसाठी पात्र ७ उमेदवारांना “सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत), गट-ब राजपत्रित” या पदावर सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतन स्तर

एस-१६ (रुपये ४४९००-१४२४००) मध्ये जलसंपदा विभागात ते ज्या दिवशी रुजू होतील त्या दिनांकापासून त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या प्रवर्गामध्ये दोन वर्षांच्या परिवीक्षाधीन कालावधीसाठी विहित अटी व शर्तींच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे.

२. परिशिष्ट - अ येथील उमेदवारांना महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब ( राजपत्रित व अराजपत्रित ) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुल विभाग वाटप नियम, २०२१ लागू राहील.

३. महाराष्ट्र अभियांत्रिकी (विद्युत), सेवा गट-ब (राजपत्रित) मधील उमेदवारांची तात्पुरती नियुक्ती ही दोन वर्षाचा परिवीक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण करण्याच्या व खालील विहित अटी / शर्तींच्या अधीन असेल :-

(१) सदर उमेदवारांची महाराष्ट्र अभियांत्रिकी (विद्युत), सेवा गट-ब (राजपत्रित) जलसंपदा विभागातील पदस्थापना ही अंतिम असून त्यात बदल होणार नाही.

(२) परिशिष्ट-अ मधील परिवीक्षाधीन उमेदवारांनी त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या सविस्तर पदस्थापनेच्या ठिकाणी आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत तात्काळ रुजू व्हावे. सदर विहित कालावधीत उमेदवार रुजू झाला/झाली नाही तर तो/ती वरील पदावरील नियुक्ती स्विकारण्यास इच्छुक नाहीत, असे गृहित धरण्यात येईल व त्यांचे नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. सदर उमेदवारांचा नियुक्तीकरीता कोणत्याही परिस्थितीत विचार करण्यात येणार नाही. यासाठी उमेदवारांकडून देण्यात येणाऱ्या कोणत्याही कारणांचा/विनंतीचा विचार केला जाणार नाही.

(३) मुदतवाढीसंदर्भात सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्रमांक : एसआरव्ही २०१६/प्र.क्र.२८१/१२, दिनांक २१.०६.२०२१ मधील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात येईल.

(४) संदर्भ क्र.३ येथील शासन अधिसूचने अन्वये विनियमित केलेल्या महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ मधील तरतूदीनुसार सदरहू उमेदवारांची सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत ), गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील ज्येष्ठता निश्चित करण्यात येईल.

(५) आवश्यकता भासल्यास, परिशिष्ट-अ मधील उमेदवारांना भारताच्या संरक्षण सेवेतील पदावर किंवा भारताच्या संरक्षणाशी निगडीत असलेल्या कुठल्याही पदावर देशात किंवा परदेशात प्रशिक्षणाचा कालावधी धरुन ४ वर्षांपेक्षा कमी नसणाऱ्या कालावधीसाठी भारत सरकार ठरविल त्या शर्तीवर सेवा करावी लागेल.

परंतु

(अ) त्यांच्या नियुक्तीनंतर १० वर्षांचा कालावधी संपल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही किंवा,

(ब) सर्वसाधारणपणे त्यांच्या वयाची ४० वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही.

(६) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवी २७१५/प्र.क्र.३०२/कार्या.८, दिनांक २२.०६.२०२१ मधील तरतूदीनुसार परिशिष्ट-अ मधील उमेदवारांना परिवीक्षा कालावधीमध्ये कोणतीही वेतनवाढ अनुज्ञेय असणार नाही.

(७) परिशिष्ट -अ येथील उमेदवारांपैकी ज्यांनी मराठी व हिंदी परिक्षा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल किंवा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर मराठी व हिंदी भाषा परीक्षा यासंबंधी केलेल्या नियमानुसार त्यांना भाषा परिक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

(८) **महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या सर्व मागासवर्गीय उमेदवारांचे जातीचे दावे नियुक्तीपूर्वी संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांचेकडून तर अनुसूचित जमातीच्या उमेदवारांचे दावे आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचेकडून तपासून घेण्याबाबत कळविले आहे.** त्यानुसार मागास प्रवर्गाच्या आरक्षित पदावर शिफारस झालेल्या तसेच आरक्षित प्रवर्गातील असूनदेखील आयोगाने ज्यांची खुला प्रवर्गातून शिफारस केलेली आहे अशा नियुक्ती दिलेल्या मागासवर्गीय उमेदवारांनी जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्रे शासनास सादर केलेली आहेत. सदर उमेदवारांचे जातीचे दावे संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांचेकडे तर अनुसूचित जमातीच्या उमेदवारांचे दावे आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचेकडे तपासणीकरिता पाठविण्यात आले होते. त्यानुसार ज्या मागासवर्गीय उमेदवारांच्या जात वैधता प्रमाणपत्राच्या सत्यतेबाबतचा तपासणी अहवाल संबंधित समितीकडून शासनास अद्याप प्राप्त झालेला नाही, अशा उमेदवारांची नियुक्ती सदरहू तपासणी अहवाल संबंधित समितीकडून शासनास प्राप्त होण्याच्या अधीन राहील. (गुणवत्ता क्रमांक : ५६)

(९) परिशिष्ट अ येथील उमेदवारांची सबंधित वैद्यकीय मंडळाकडून तपासणी झाली असून सर्व उमेदवारांची वैद्यकीय प्रमाणपत्रे प्राप्त झाली आहेत.

(१०) परिशिष्ट-अ मधील उमेदवारांचे चारित्र्य पडताळणी अहवाल सबंधित पोलिस आयुक्त/अधीक्षक कार्यालयाकडून प्राप्त झाले आहेत.

(११) इतर मागासवर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती आणि विशेष मागास कल्याण विभागाच्या शासन निर्णय क्रमांक: सीबीसी-२०२०/प्र.क्र.१८/मावक, दि.३१/०१/२०२० नुसार खुल्या प्रवर्गातील महिला, विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील व्यक्ती आणि आर्थिकदृष्टया दुर्बल घटक या प्रवर्गातील प्रगत व उन्नत गटात समाविष्ट नसलेल्या व्यक्तींना सक्षम प्राधिकारी यांनी निर्गमित केलेल्या NCL/ आर्थिकदृष्टया दुर्बल घटक प्रमाणपत्राच्या वैधता पडताळणीसाठी राज्यातील प्रादेशिक महसूली विभाग स्तरावर "विभागीय आयुक्त" यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीकडून NCL/ आर्थिकदृष्टया दुर्बल घटक प्रमाणपत्राची (उत्पनाच्या दाखल्याची) तपासणीअंती वैध ठरण्याच्या अटीच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे.

(१२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक ०७/०८/२००१ अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरिता संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. प्रशिक्षण

२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९/०३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षांच्या आत उपलब्ध करून देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहित मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करून दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येतील. तसेच, ज्यांना या बाबतीत सूट अनुज्ञेय आहे त्यांची प्रकरणे प्रचलीत शासन निर्णयानुसार संबंधीत कार्यालय प्रमुखांनी तपासावीत.

(१३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अंनियो १००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१.१०.२००५ व वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक:अंनियो/२०१२/प्र.क्र.९६/सेवा-४, दि.२७/०८/२०१४ मधील तरतूदीनुसार परिशिष्ट-अ मधील उमेदवारांना राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू राहील.

(१४) परिशिष्ट-अ मधील उमेदवारांना शासन सेवेत रुजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा द्यावयाचा असल्यास, त्यांना शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही १०९२/ १०३३/ प्र.क्र.३३/९२/८, दिनांक ०२/१२/१९९७ मधील तरतुदीनुसार शासनाला किमान १ (एक) महिन्याची आगाऊ लेखी सूचना किंवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक राहील. यासंदर्भातील राजीनामा स्विकारण्याचे अधिकार केवळ नियुक्ती प्राधिकारी (शासन) यांना असतील. क्षेत्रिय कार्यालयांनी परस्पर प्रशिक्षणार्थ्याचा राजीनामा स्विकृत करु नये किंवा मंजूर करु नये. तथापि, राजीनामा दिल्यानंतर पुन्हा राजीनामा मागे घ्यावयाचा असल्यास, त्यांना वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अंनियो २०१९/प्र.क्र.४७०/सेवा-४, दिनांक ०९.०५.२०२२ मधील तरतूदी लागू राहतील.

मात्र, गैरवर्तणूक, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी सूचना देण्याचे बंधन शासनावर राहणार नाही.

(१५) महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणासंबंधी, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दिनांक २३.०९.२०११ मधील परिच्छेद सहा येथील तरतूदीनुसार प्रशिक्षण सुरु होण्यापूर्वी प्रशिक्षणार्थीने सक्षम प्राधिकाऱ्यास बंधपत्र लिहून द्यावे लागेल. जर एखादा प्रशिक्षणार्थी बंधपत्रात नमूद केलेल्या कालावधीत नोकरी सोडत असेल तर बंधपत्रात नमूद केलेली रक्कम प्रशिक्षणार्थीकडून वसूल करुन संबंधित प्राधिकाऱ्याला प्रथम शासनाकडे जमा करावी लागेल. याबाबतचे दर शासन निश्चित करेल. त्यानुसार प्रत्येक उमेदवाराला रुजू झाल्यानंतर संबंधित कार्यालयाकडे विहित नमुन्यातील बंधपत्र भरुन सादर करणे बंधनकारक राहील व त्याची प्रत शासनास सादर करावी.

(१६) परिशिष्ट अ येथील उमेदवारांना जलसंपदा विभाग शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०१५/प्र.क्र.१७४/१५/जवि), दि.०७.०६.२०२१ अन्वये विहित प्रशिक्षण पूर्ण करणे आवश्यक राहील.

(१७) प्रशिक्षणादरम्यान प्रशिक्षणार्थीकडून प्रबोधिनीच्या प्रशिक्षणाबाबतच्या नियमांचे व शिस्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. त्यांच्याकडून नियमभंग झाल्यास प्रबोधिनीकडून त्यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल व तसा अहवाल शासनास विनाविलंब पाठविण्यात यावा.

(१८) परिशिष्ट- अ येथील उमेदवारांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवी २७१५/प्र.क्र.३०२/कार्या.८, दिनांक २२.०६.२०२१ नुसार नवीन परिवीक्षा धोरण लागू राहील. **" सदरहू सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत ), गट-ब यांना दोन वर्षाचा परिवीक्षाधीन कालावधी लागू राहील. सदर कालावधीत परिवीक्षा धोरणानुसार शासकीय कामकाज करण्यास सक्षम नसल्याचे सिद्ध झाल्यास संबंधित उमेदवाराची शासकीय सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल."**

(१९) परिशिष्ट-अ मधील उमेदवारांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : परिवि २७१५/प्र.क्र.३०२/८, दिनांक २२.०६.२०२१ मध्ये नमूद केल्यानुसार परिवीक्षाधीन कालावधीत रजेच्या तरतूदी लागू होतील.

(२०) परिशिष्ट-अ येथील उमेदवारांपैकी पूर्वी शासकीय सेवेत असणाऱ्या उमेदवारांची सरळसेवेने शासनाच्या दुसऱ्या पदावर परिवीक्षाधीन उमेदवार म्हणून नियुक्ती झाली असल्यास अशा उमेदवारांची सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत), गट-ब (राजपत्रित) या पदावरील वेतननिश्चिती ही शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : वेतन १२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३, दिनांक २३.०३.१९९४ मधील तरतूदीनुसार करण्यात यावी.

तर परिशिष्ट -अ मधील उमेदवारांपैकी पूर्वी शासकीय सेवेत नसणाऱ्या उमेदवारांची सरळसेवेने शासनाच्या परिवीक्षाधीन उमेदवार म्हणून नियुक्ती झाली असल्यास अशा उमेदवारांची सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत), गट-ब (राजपत्रित) या पदावरील वेतननिश्चिती ही महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतूदीनुसार करण्यात यावी.

(२१) परिशिष्ट-अ मधील उमेदवार सध्या केंद्र/राज्य शासनाच्या सेवेत अथवा निमशासकीय सेवेत कार्यरत असतील तर संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी त्यांना नेमणूकीच्या ठिकाणी हजर होण्याच्या दृष्टीने सदर सेवेतून कार्यमुक्त झाल्याचे अथवा तसे लेखी पत्र सादर केल्याशिवाय त्यांना रुजू करुन घेता येणार नाही. तसेच सदर उमेदवारांची नियुक्ती ही त्यांचे केंद्र/राज्य शासनाच्या सेवेत अथवा निमशासकीय सेवेतील ना-चौकशी प्रमाणपत्र त्यांच्या संबंधित कार्यालयाकडून प्राप्त होण्याच्या अधीन राहील. (गुणवत्ता क्रमांक: ५२,५५).

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६१२१७५४०३५०२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

DEELIP PANDURANG PATIL

Digitally signed by DEELIP PANDURANG PATIL
DN: CN = DEELIP PANDURANG PATIL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2025.06.12 17:56:34 +05'30'

**(दिलीप पां.पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत : परिशिष्ट-अ**

**प्रति,**

परिशिष्ट अ मधील उमेदवार यांना ई-मेल संदेशाद्वारे

**प्रत :-**

१. अ.मु.स. (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. मा. मंत्री,जलसंपदा (गोदावरी आणि कृष्णा खोरे विकास महामंडळ) यांचे खाजगी सचिव.
३. मा. मंत्री,जलसंपदा (विदर्भ, तापी व कोकण विकास महामंडळ ) यांचे खाजगी सचिव.
४. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने)
७. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण व संशोधन, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
८. मुख्य अभियंता (विद्युत ),जलविद्युत प्रकल्प, मुंबई.
९. महालेखापाल-१/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१०. महालेखापाल-१/२, लेखा परीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
११. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. उप सचिव (सेवा)/(प्रशासन), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी, कार्यासन (आ(संनि)/आ(वर्ग-२)/गोपनीय/नोंदणी शाखा, जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४. संग्रहार्थ/कार्यासन आ(स.अ. श्रे-२)

जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक : नियुक्ती २०२५/प्र.क्र. ०१(१)/आ (स.अ.श्रे.२), दिनांक १२ जून, २०२५ सोबतचे

"परिशिष्ट -अ"

## सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत) गट ब (राजपत्रित) पदावर नियुक्तीने पदस्थापना

| अ.क्र. | मलोआ गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नांव | उमेदवाराचा मुळ प्रवर्ग | म.लो.आ. शिफारस प्रवर्ग | पसंती दिलेला महसूल विभाग | अंतिम महसूल विभाग वाटप | सविस्तर पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | ५०/२०२२ | श्री.श्रेयस मोहन चव्हाण | खुला | खुला | पुणे | पुणे | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई अंतर्गत पुणे महसूल विभागातील अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, उभारणी विभाग (विवयां) क्र.३, कोयनानगर, ता.पाटण, जि.सातारा. |
| २ | ५१/२०२२ | श्री. संतोष सुपचंद पटले | खुला | खुला | नागपूर | नागपूर | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई अंतर्गत नागपूर महसूल विभागातील अधीक्षक अभियंता, विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, नागपूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन विभाग, भंडारा |
| ३ | ५२/२०२२ | श्री.अमित राजेसाहेब लोमटे | खुला | खुला खेळाडू ऐवजी | छत्रपती संभाजीनगर | छत्रपती संभाजीनगर | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई अंतर्गत छत्रपती संभाजीनगर महसूल विभागातील अधीक्षक अभियंता, तापी-गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, जळगांव अंतर्गत कार्यकारी अभियंता, गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन विभाग, छत्रपती संभाजीनगर, उपअभि.गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन उप विभाग क्र. ३ छत्रपती संभाजीनगर |
| ४ | ५३/२०२२ | श्री.सागर संपत कुदळे | इमाव | इमाव | पुणे | पुणे | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई अंतर्गत पुणे महसूल विभागातील अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, ताकारी विद्युत (विवयां) उपसा सिंचन विभाग, सांगली |
| ५ | ५४/२०२२ | श्रीमती सुलोचना केशव मोरे | खुला महिला | खुला महिला | पुणे | पुणे | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई अंतर्गत पुणे महसूल विभागातील अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, टेंभू विद्युत (विवयां) उपसा सिंचन विभाग,ओगलेवाडी, ता.कराड, जि.सातारा अंतर्गत उप अभियंता टेंभू विद्युत उप विभाग क्र. १ ओगलेवाडी, ता. कराड जि.सातारा |

| अ.क्र. | मलोआ गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नांव | उमेदवाराचा मुळ प्रवर्ग | म.लो.आ. शिफारस प्रवर्ग | पसंती दिलेला महसूल विभाग | अंतिम महसूल विभाग वाटप | सविस्तर पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ६ | ५५/२०२२ | श्री.प्रशांत बाळकृष्ण साठे | अजा | अजा | नाशिक | नाशिक | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई अंतर्गत नाशिक महसूल विभागातील अधीक्षक अभियंता, तापी गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, जळगांव अंतर्गत कार्यकारी अभियंता, तापी जलविद्युत व उपसा सिंचन विभाग क्र. २ धुळे |
| ७ | ५६/२०२२ | श्रीमती मिनल शरद चौधरी | इमाव महिला | इमाव महिला | अमरावती | अमरावती | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई अंतर्गत अमरावती महसूल विभागातील अधीक्षक अभियंता, विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, नागपूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन विभाग, यवतमाळ अंतर्गत उप अभियंता विदर्भ जलविद्युत प्रकल्प उपविभाग क्र. २ अमरावती |

DEELIP PANDURANG PATIL

Digitally signed by DEELIP PANDURANG PATIL
DN: CN = DEELIP PANDURANG PATIL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2025.06.12 17:56:47 +05'30'

(दिलीप पां. पाटील

अवर सचिव, महाराष्ट्र शासन